आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१५/प्र.क्र.१९/का.१५

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-३२.
तारीख: ४.०३.२०१५

**वाचा -**

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५.

२) आदिवासी विकास विभाग, शासन राजपत्रक क्र. संकीर्ण-२००६ / प्र.क्र.१३० / का.१५, दि.१२/०६/२००७.

३) सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही-२०१४/व्हीआयपी-२८४/ प्र.क्र.३६२ / १२, दि.२६/११/२०१४ व दि.०९/१२/२०१४

**प्रस्तावना**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ हा दिनांक १ जुलै २००६ रोजी अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम ६ मधील दुसरे परंतुकातील तरतुदीनुसार आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्यांचे काही अधिकार प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ६ मधील दुसऱ्या परंतुकातील तरतुदीनुसार आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयातील पुढील तक्त्यातील स्तंभ क्र.२ येथे नमुद अधिकारी / कर्मचारी यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | शासकीय कर्मचाऱ्याचे गट व पदनाम | वेतनश्रेणी (रुपये) | सक्षम प्राधिकारी | या आदेशाद्वारे बदली अधिकार प्रत्यार्पित करण्यात आलेले अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | सहआयुक्त/ सहआयुक्त तथा उपाध्यक्ष / सहसंचालक | १५६००-३९१००+ ग्रेड पे ७६०० | मा. मुख्यमंत्री | मा. मंत्री (आ.वि) |
| २ | उपआयुक्त/ उपसंचालक (सं ) / प्रकल्प अधिकारी (श्रेणी-१ ) | १५६००-३९१००+ ग्रेड पे ६६०० | मा. मंत्री (आ.वि.) | सचिव (आ.वि) |
| ३ | सहायक आयुक्त/ वरिष्ठ संशोधन अधिकारी/ प्रकल्प अधिकारी (श्रेणी-२) | १५६००-३९१००+ ग्रेड पे ५४०० | मा. मंत्री (आ.वि) | सचिव (आ.वि) |
| ४ | सहायक प्रकल्प अधिकारी/ स्वीय सहायक / गृहप्रमुख/ संशोधन अधिकारी व तत्सम | ९३००-३४८००+ ग्रेड पे ४४०० | मा. मंत्री (आ.वि) | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक. |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०५११०८०३९८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrashekhar J Deshpande

Digitally signed by Chandrashekhar J Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrashekhar J Deshpande
Date: 2015.03.05 11:20:50 +05'30'

(चं.ज. देशपांडे)
उप सचिव

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.मंत्री (आ.वि), मंत्रालय, मुंबई,
३) मा.राज्यमंत्री (आ.वि), मंत्रालय, मुंबई,
४) मा. अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) मा. सचिव (आ.वि), मंत्रालय, मुंबई,
६) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
७) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
८) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर,

९) सर्व सह आयुक्त, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्या,
१०) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
११) सर्व उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) निवड नस्ती क्र.१५.